जलसंपदा विभागांतर्गत प्रकल्प अमलबजावणी कक्षाची (PIU) पुर्नस्थापना करणे व ई -प्रशासन मंडळ, पुणे अंतर्गतच्या माहिती व्यवस्थापन व प्रशिक्षण विभाग, मुंबई यांचेकडे PIU संबंधी कामकाज सोपविण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- सिडीए २०२०/(प्र.क्र. ३६/२०)/लाक्षेवि (कामे)**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- १४ ऑगष्ट, २०२०

**<u>संदर्भ :-</u>** (१) शासन निर्णय क्र. ई-प्रशासन-२०१६/(३६/२०१६)/लपा-१, दि. ०२/०४/२०१६.
(२) शासन आदेश क्र. Misc-२०१७/१९/ (०७/१७)/WR(Est), दि. १८/०५/२०१७
(३) शासन आदेश क्र. Misc-२०१८/४४६(१२०/१८)/WR(Est), दि. ०८/१०/२०१८

**<u>प्रस्तावना :-</u>**

जलसंपदा विभागाच्या शासन आदेश दि.१८/०५/२०१७ अन्वये Sustainable and Efficient Approaches and Solutions in Water Management करीता मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली Multi Stakeholder Platform - Steering Board ची स्थापना करण्यात आली आहे. सदर Steering Board ला तांत्रिक सहाय्य जागतिक बँकेला सहाय्य करणारे Water Resources Group - २०३० (WRG - २०३०) करीत आहे. Multi Stakeholder Platform चा उद्देश हे लाभक्षेत्रातील Water Use Efficiency and Productivity बाबतच्या समस्या सर्व Multi Stakeholder कडून निराकरण होणे अपेक्षित आहे. यासाठी Command Area Work Stream स्थापित करण्यात आली आहे. Command Area Work Stream च्या शिफारशीनुसार Project Implementation Unit (PIU) ला सहाय्य करण्यासाठी जलसंपदा विभागात अस्तित्वात असलेल्या आस्थापनेतुन काम करुन घेण्याचे शासनाच्या विचाराधिन होते. या विषयी शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**<u>शासन निर्णय :-</u>**

१. ई - प्रशासन मंडळ, पुणे अंतर्गत असलेल्या माहिती व्यवस्थापन व प्रशिक्षण विभाग, मुंबई या विभागाकडे अनु.क्र. १ येथील शासन निर्णयान्वये सोपविण्यात आलेल्या कामाव्यतिरिक्त खाली नमूद केल्यानुसार नव्याने कामे सोपविण्याबाबत याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

- राज्यात जलव्यवस्थापने अंतर्गत नाविन्यपूर्ण प्रकल्पांची संकल्पना करुन त्यांची प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रणाद्वारे Multi Stakeholder Platform - Steering Board च्या उद्दिष्टांची पूर्तता करणे.
- वरील कामे करतांना शासनाच्या विविध विभागांमध्ये समन्वय साधणे.
- सामाजिक संस्था व खाजगी सहभाग (Public Private Partnership - PPP) व खाजगी कंपन्याची सामाजिक बांधिलकीद्वारे प्रकल्प राबविणे व त्यास्तव सर्व उपाय योजना करणे.
- व्यापक स्तरावर पाणी वापर संस्थांचे बळकटीकरण करणे, त्यांचे प्रभावी कार्यान्विकरण करणे व सिंचन प्रणालीचे शेतक-यांकडून व्यवस्थापन या कार्यक्रमास कार्यक्षमपणे राबविणे

- जागतिक बॅक व अन्य वित्तीय संस्थेच्या सहाय्याने राबवावयाच्या प्रकल्पांकरीता सर्व कार्यवाही हाताळणे.

तसेच उपरोक्त कामाव्यतिरिक्त संदर्भाधिन अनु.क्र. १, २, व ३ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केलेली कामे, कर्तव्य, जबाबदा-या व इतर नमुद बाबी लागू राहतील.

२. माहिती व्यवस्थापन व प्रशिक्षण विभाग, मुंबई या विभागाच्या कामांचे नियंत्रण खालीलप्रमाणे राहील.

- नव्याने सोपविण्यात आलेल्या कामांचे नियंत्रण उपसचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्याकडे राहील.
- माहिती व्यवस्थापन व प्रशिक्षण विभाग, मुंबई या विभागाकडे संदर्भाधिन अनु.क्र. १ येथिल शासन निर्णयान्वये सोपिविण्यात आलेल्या कामांचे नियंत्रण पूर्वीप्रमाणेच राहील.

३. ई - प्रशासन मंडळ, पुणे अंतर्गत असलेल्या माहिती व्यवस्थापन व प्रशिक्षण विभाग, मुंबई येथील मूळ मंजुर पदांपैकी खालील पदे संदर्भाधिन शासन आदेश क्र. ३ मध्ये नमुद Project implementation Unit (PIU) ला सहाय्य करुन समन्वय व सनियंत्रण ची जबाबदारी देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| अ) कार्यकारी अभियंता | - १ पद |
| आ) उप अभियंता | - २ पदे |
| इ) वरीष्ठ लिपिक | - १ पद |
| ई) लिपिक - टंकलेखक | - २ पदे |
| उ) शिपाई | -१ पद |
| ऊ) वाहनचालक | - १ पद |

त्यानुसार प्रकल्प अमलबजावणी कक्षाची रचना खालील प्रमाणे राहील.

| | |
|---|---|
| १) मुख्य अभियंता (पा.) व सह सचिव, जलसंपदा विभाग<br>(प्रकल्प अंमलबजावणी कक्ष प्रमुख) | - १ पद |
| २) मुख्य अभियंता तथा सहसचिव, मृद व जलसंधारण, मंत्रालय | - १ पद |
| ३) अधिक्षक अभियंता तथा उप सचिव ( लाक्षेवि), जलसंपदा विभाग | - १ पद |
| ४) उप सचिव, कृषि विभाग, मंत्रालय | - १ पद |
| ५) कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग | - १ पद |
| ६) उप अभियंता, जलसंपदा विभाग | - २ पदे |
| ७) वरीष्ठ लिपिक, जलसंपदा विभाग | - १ पद |
| ८) लिपिक - टंकलेखक, जलसंपदा विभाग | - २ पदे |
| ९) शिपाई, जलसंपदा विभाग | - १ पद |
| १०) वाहनचालक, जलसंपदा विभाग | - १ पद |
| ११) PPP Expert | - १ पद |
| १२) Project / Micro Finance Expert | - १ पद |
| १३) Community mobilization / Communications Expert | - १ पद |

१४) Project Monitoring and Evaluation Expert - १ पद

१५) Technology Expert ( ITC, Weather advisory, GIS Expert ) - १ पद

१६) Capacity Building Expert - १ पद

अनुक्रमांक ५ ते १० ची पदे अंतर्गतच्या पदांचे वेतन व भत्ते ई-प्रशासन मंडळ, पुणे अंतर्गत माहिती व्यवस्थापन व प्रशिक्षण विभाग, मुंबई मार्फत अदा करण्यात यावेत. त्याचप्रमाणे अनु. क्र. ११ ते १६ ही पदे Outsourcing व्दारे नियुक्त करण्यात यावेत व त्यांच्या वेतनावरील खर्च जलसंपदा विभागांतर्गत लाक्षेवि/ई-प्रशासन मंडळातील उपलब्ध निधीतून भागवावा किंवा आवश्यकतेनुसार पाटबंधारे विकास महामंडळामार्फत बिगर सिंचन पाणीपट्टी वसुली मधून उपलब्ध करण्यात यावेत.

४. उक्त शासन निर्णयाची अमलबजावणी सदर शासन निर्णयाच्या दिनांका पासुन करावी.

५. सदरचा शासननिर्णय कृषि विभाग त्याचप्रमाणे मृद व जलसंधारण विभागाच्या सहमतीने तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्र. १०९२/सीआर - ८०६/व्यय-६, दि. १५/१०/१९९२ मधील तरतुदीनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकरारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२००८२०१३१२५३५९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dinesh Shamrao Ghatge

Digitally signed by Dinesh Shamrao Ghatge
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a5e2f1698bf0950eae5b58e4f323417e5094110c7c24101a0a100ef0a65eb52, serialNumber=944d3f4edf4e98ce36bb02c01a960ec79035a248f041f4852083df7179215b06, cn=Dinesh Shamrao Ghatge
Date: 2020.08.20 13:18:57 +05'30'

**( दि. शा. घाटगे )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
५. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
६. मा.राज्यमंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
७. मा.विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद/विधानसभा
८. मा.विधानपरिषद/विधानसभा सदस्य (सर्व)
९. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव (जसंप्र व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर
१४. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/नागपूर
१५. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई

१६. महासंचालक, संकल्पन, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षा (DTHRS) मेरी, नाशिक.
१७. सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
१८. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, पुणे.
१९. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
२०. आंतर वित्तीय सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. उप सचिव (सेवा)/ उप सचिव (आस्था)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. उप सचिव {लाक्षेवि (कामे), जलसंपदा विभाग
२३. अधीक्षक अभियंता व संचालक, पाटबंधारे संशोधन व विकास संचालनालय,पुणे,
२४. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
२५. अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, पुणे.
२६. कार्यकारी अभियंता, माहिती व्यवस्थापन व प्रशिक्षण विभाग, मुंबई.
२७. कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयाच्या मुख्यालयात व नियंत्रणात होणाऱ्या बदलांची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
२८. उप अभियंता, माहिती व्यवस्थापन व प्रशिक्षण विभाग, मुंबई.
२९. सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
३०. कार्यासन आस्थापना (पुनर्रचना), जलसंपदा विभाग
३१. निवडनस्ती (लाक्षेवि/कामे).